सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत शासकीय निवासी शाळातील प्रवेशित विद्यार्थ्यांना शालेय गणवेश खरेदी करण्यासाठी विद्यार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात थेट रक्कम जमा करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक: बीसीएच-२०२२/प्र.क्र.४० /शिक्षण-२**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ११ जून, २०२५

वाचा:-

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:-बीसीएच-१०८२/९०३८५/(३८)/बीसीडब्ल्यु-४, दि.१६ मे १९८४.
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- बीसीएच-२००२/प्र.क्र. २६८/मावक-४, दि. ४ जुलै, २००३.
३. शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- बीसीएच-२०१०/प्र.क्र. ४३०/मावक-४, दि. २६ जुलै, २०११.
४. शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्रमांक:- भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१ डिसेंबर, २०१६.
५. शासन निर्णय,नियोजन विभाग,क्रमांक:- सीटी २३१६/प्र.क्र.१३३/का.१४१७,दि.५ डिसेंबर,२०१६.
६. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/शानिशा/तरतूद मागणी/शिक्षण/का-५अ /२५-२६/५८,दि.२५.४.२०२५

प्रस्तावना:-

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या मुलां-मुलींसाठी प्रत्येक तालुक्यात एक अशा एकूण ३५३ शासकीय निवासी प्राथमिक शाळा सुरू करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार पहिल्या टप्प्यात १०० शासकीय प्राथमिक निवासी शाळांना मान्यता देण्यात आलेली असून आजपर्यंत एकूण ९२ शासकीय निवासी शाळा सुरू करण्यात आलेल्या आहेत. सदर निवासी शाळांमध्ये एकूण १८४०० विद्यार्थी प्रवेशित आहेत. शासकीय निवासी शाळांमधील प्रवेशित विद्यार्थ्यांना भोजन व इतर सोयीसुविधा विभागाच्या संदर्भ क्र. १ ते ३ येथील शासन निर्णयान्वये अनुज्ञेय करण्यात आलेल्या आहेत. शासनाव्दारे थेट लाभ हस्तांतरण प्रक्रीयेवर मोठया प्रमाणावर भर देण्यात येत असून त्यानुषंगाने नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील दिनांक ५ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये विविध कल्याणकारी योजनेअंतर्गत वस्तू स्वरूपात देण्यात येणाऱ्या लाभाऐवजी त्याकरीता रोख स्वरूपात थेट निधी लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला आहे.

उपरोक्त तरतुदीस अनुसरून सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत शासकीय निवासी शाळातील प्रवेशित विद्यार्थ्यांना त्यांच्या आवडीनुसार शालेय गणवेश खरेदी करण्यास मुभा मिळावी व खरेदीमध्ये पारदर्शकता राहण्याच्या दृष्टीने आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी संदर्भाधीन क्रमांक ६ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून सन २०२५-२६ या शैक्षणिक वर्षासाठी शासकीय निवासी शाळातील विद्यार्थ्यांना शालेय गणवेश खरेदी करण्यासाठी लाभाचे हस्तांतरण रोख स्वरूपात (DBT) विद्यार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द मुला-मुलींच्या शासकीय निवासी शाळांमधील प्रवेशित विद्यार्थ्यांना शालेय गणवेश खरेदी करण्यासाठी प्रति विद्यार्थी प्रति गणवेश एकूण रक्कम रू. १,१४१.५/- याप्रमाणे एकूण रक्कम रू. ४,२०,०७,२००/- (अक्षरी रक्कम रूपये चार कोटी वीस लाख सात हजार दोनशे फक्त) इतकी रक्कम विद्यार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यामध्ये जमा करण्यास मान्यता देण्यात येत असून, त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | वस्तूंचे नाव | अंतिम मागणी | आयुक्त,समाजकल्याण, पुणे यांच्याकडून प्राप्त किंमत (प्रती नग) (जीएसटीसह) | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|
| | १ | २ | ४ | ५ |
| १. | शालेय गणवेश (School Uniform) | ३६८०० (प्रति विद्यार्थी दोन याप्रमाणे) | रू.११४१.५ | रू.४,२०,०७,२००/- |
| | | | | **रू.४,२०,०७,२००/-** |

**(अक्षरी रूपये चार कोटी वीस लक्ष सात हजार दोनशे फक्त)**

३. **उपरोक्त शालेय गणवेशाऐवजी विद्यार्थ्यास रोख स्वरूपात थेट लाभ देताना अनुसरावयाची कार्यपध्दती खालीलप्रमाणे आहे :-**

३.१ सामाजिक न्याय विभागांतर्गत अनुसूचित जाती व नवबौध्द मुला-मुलींच्या शासकीय निवासी शाळांमधील प्रवेशित विद्यार्थ्यांना शालेय गणवेश स्वत: खरेदी करण्यासाठी प्रति विद्यार्थी प्रति गणवेश एकूण रक्कम रू. ११४१.५/- इतकी रक्कम विद्यार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करण्यात यावी.

३.२ शासकीय निवासी शाळेत प्रवेशित विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या शालेय गणवेशासाठी रोख स्वरूपात थेट रक्कम मिळणार आहे. त्या वस्तूचे परिमाण व संख्या इ.तपशीलाची यादी सबंधित निवासी शाळेतील मुख्याध्यापक यांनी विद्यार्थी/पालकांना उपलब्ध करून देण्यात यावी. तसेच,निवासी शाळेतील प्रवेशित सर्व विद्यार्थ्याचे बँक खाते उघडून त्यास आधार क्रमांक संलग्न करण्यात यावा. अशा आधार क्रमांक संलग्न असलेल्या बँक खात्यामध्येच उपरोक्त निश्चित केल्यानुसार देय रक्कम थेट जमा करण्यात यावी. सदर जमा करण्यात आलेल्या रोख रकमेतून विद्यार्थ्यांनी विहीत परिमाण व

तपशीलाप्रमाणे वस्तूंची खरेदी केल्याबाबतची खातरजमा सबंधित निवासी शाळेतील मुख्याध्यापक यांचेमार्फत करण्यात यावी.

४. उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे आधार क्रमांक संलग्न बँक खात्यावर लाभ देण्याबाबतची कार्यवाही करताना विद्यार्थ्यांचा आधार क्रमांक,बँक खाते क्रमांक व त्याच्याशी सबंधित कोणतीही वैयक्तिक स्वरूपाची माहिती जाहीरपणे प्रकाशित करू नये,किंवा अशी माहिती ऑनलाईन प्रणालीव्दारे सहजरित्या उपलब्ध होणार नाही, याची खबरदारी घेण्यात यावी. लाभार्थ्यांना लाभ देण्यापुरताच अशा माहितीचा वापर करण्यात यावा,आणि याविषयी केंद्रीय आधार कायदा, २०१६ तसेच माहिती तंत्रज्ञान कायदा, २००० व त्याखालील नियम, २०११ मधील तरतुदीचे पालन करून कार्यवाही करण्यात यावी.

५. उपरोक्त प्रमाणे विहीत वेळेत कार्यवाही करून केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण यांनी प्रादेशिक आयुक्त, समाज कल्याण यांचेमार्फत आयुक्त,समाज कल्याण,पुणे यांना सादर करावा. आयुक्त,समाज कल्याण,पुणे यांनी याबाबत विहीत कार्यपध्दतीनुसार सर्व विभागांतर्गत शासकीय निवासी शाळातील विद्यार्थ्यांना वस्तू स्वरूपात मिळणाऱ्या लाभाचे हस्तांतरण रोख स्वरूपात लाभार्थ्याच्या आधार खाते संलग्न बँक खात्यात थेट जमा करण्यात आली असल्याबाबतचा एकत्रित अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

६. याकरीता संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक आयुक्त,समाज कल्याण, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. याबाबत होणारा खर्च हा मागणी क्र. “एन-३ मुख्य लेखाशीर्ष २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, २७७, शिक्षण (०१) वसतिगृहे (१०) शासकीय निवासी शाळा - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (१०) (०१) अनुसूचित जातीच्या मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय निवासी शाळा सुरू करणे (अ.जा.उ.यो.) कार्यक्रम, (२२२५-D११७) ५०- इतर खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून त्याखाली मंजूर केलेल्या सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. सदर आदेश,नियोजन विभागाच्या शासन निर्णय,क्रमांक डिसीटी २३१६/ प्र.क्र.१३३/ का.१४१७,दि. ५ डिसेंबर,२०१६ अन्वये विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६११६३२३०६२२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SOMNATH NAMDEO BAGUL

Digitally signed by SOMNATH NAMDEO BAGUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4807C89831881EDE55B0D82CB9991539D1BD33C6F8A64931D9194D5E2CBDCF56, cn=SOMNATH NAMDEO BAGUL
Date: 2025.06.11 16:33:21 +05'30'

**( सो.ना.बागुल )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई

२. मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई,
५. प्रधान सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
६. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा) (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
८. सर्व प्रादेशिक उपायुक्त,समाज कल्याण,
९. सर्व सहायक आयुक्त,समाज कल्याण,
१०.जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे,
११.कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प),सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई,
१२.निवड नस्ती (शिक्षण-२).